विषलाक्षादन्तकेश- ।
रसवाणिज्यमङ्गिरुक् ॥ २२ ॥
इति केचिन्न तच्चारु ।
लोके सावद्यकर्मणाम् ॥
अगण्यत्वात्प्रणेयं वा ।
तदप्यतिजडान् प्रति ॥ २३ ॥

टीका—व्रतयेत् प्रत्याख्यायाच्छ्रावकः । किं तत् खरकर्म खरं क्रूरं प्राणिबाधकं कर्म व्यापारं । तथा त्यजेत् तद्व्रती । कान् मलान् कर्मादानसञ्ज्ञान् । कति पञ्चदश वृत्तिमित्यादिना निर्दिष्टान् । क्व अत्र खरकर्मव्रते । अत्र तावत् वृत्तिं जीविकां त्यजेत् । कैः वनाग्न्यनःस्फोटभाटकैः वनं चाग्निश्च अनश्च स्फोटश्च भाटकं च तैः पञ्चभिः । तथा यन्त्रपीडनं त्यजेत् । तथा निर्लाञ्छनासतीपोषौ त्यजेत् निर्लाञ्छनं चासतीपोषश्चेति द्वन्द्वः । तथा सरःशोषं त्यजेत् । तथा दवप्रदां दवदानं त्यजेत् । तथा विषादिवाणिज्यपञ्चकं त्यजेत् । किंविशिष्टमङ्गिरुक् प्राणिबाधकं ॥

तत्र वनजीविका छिन्नस्याच्छिन्नस्य वा वनस्पतिसमूहादेर्विक्रयेण तथा गोधूमादिधान्यानां घरट्टशिलादिना पेषणेन दलनेन वा वर्तनम् ॥ १ ॥

अग्निजीविका अङ्गारजीविकाख्या षड्जीवनिकायविराधनाहेतुना अङ्गारकरणाद्यग्निकर्मणा जीवनं ॥ २ ॥

अनोजीविका शकटजीविका शकटरथतच्चक्रादीनां स्वयं परेण वा निष्पादनेन वाहनेन विक्रयणेन वृत्तिर्बहुभूतग्रामोपमर्दिका गवादीनां च बन्धादिहेतुः ॥ ३ ॥

स्फोटजीविका उडादिकर्मणा पृथिवीकायिकाद्युपमर्दहेतुना जीवनं ॥ ४ ॥

भाटकजीविका शकटादिभारवाहनमूल्येन जीवनं ॥ ५ ॥

यन्त्रपीडाकर्म तिलयन्त्रादिपीडनं तिलादिकं च दत्वा तैलादि-प्रतिग्रहणम् । तत्कर्मणश्च पीलनाय तिलादिक्षोदाच्चद्गतत्रसघाताच्च दुष्टत्वं ॥ ६ ॥

निर्लाञ्च्छनं निर्लाञ्च्छनकर्म वृषभादेर्नासावेधादिना जीविका । निर्लाञ्च्छनं नितरां लाञ्च्छनमङ्गावयवच्छेदः ॥ ७ ॥

असतीपोषः प्राणिघ्नप्राणिपोषो भाटिग्रहणार्थं दासपोषश्च ॥ ८ ॥

सरःशोषो धान्यवपनाद्यर्थं जलाशयेभ्यो जलस्य सारण्या कर्षणं । तत्र च जलस्य तद्गतानां त्रसानां तत्पालितानां च षण्णां जीवनिकायानां घात इति दूष्यत्वम् ॥ ९ ॥

वधदानं दावाग्नेस्तृणादिदहनार्थं वितरणं । तच्च फलनिरपेक्ष-तात्पर्याद्वनेचरैर्वह्निज्वालनं व्यसनजमुच्यते । पुण्यबुद्धिजं तु यथा मदीये मरणकाले इयन्तो मम श्रेयोऽर्थं दीपोत्सवाः करणीया इति पुण्यबुध्या क्रियमाणं । तृणदाहे सति नवतृणांकुरोद्भेदाद्गावश्चर-न्तीति वा क्षेत्रे वा सस्यसम्पत्तिवृद्धयेऽग्निज्वालनं । अत्र जीवकोटी-नां वधो व्यक्त एव ॥ १० ॥

विषवाणिज्यं जीवघ्नवस्तुविक्रयः ॥ ११ ॥

लाक्षावाणिज्यं लाक्षाविक्रयणं । लाक्षायाः सूक्ष्मत्रसजन्तुघाता-नन्तकायिकप्रवालजालोपमर्दाविनाभाविना स्वयोनिवृक्षादुद्धरणेन टङ्कणमनःशिलासकूमालिप्रभृतीनां बाह्यजीवघातहेतुत्वेन गुग्गुलि-काया जन्तुघाताविनाभावित्वेन धातकीपुष्पत्वचश्च मद्यहेतुत्वेन तद्विक्रयस्य पापाश्रयत्वात् ॥ १२ ॥

दन्तवाणिज्यं हस्त्यादिदन्ताद्यवयवानां पुलिन्दादिषु द्रव्यदानेन तदुत्पत्तिस्थाने वाणिज्यार्थं ग्रहणं । ते हि तथा ग्रहणे तत्प्रतिक्रयार्थं हस्त्यादिवधं कुर्वन्ति । अनाकारे तु दन्तादिक्रयविक्रये न दोषः ॥ १३ ॥

केशवाणिज्यं द्विपदादिविक्रयः । तत्र च दोषः तेषां पारवश्यवधबन्धादयः क्षुत्पिपासापीडा चेति ॥ १४ ॥

रसवाणिज्यं नवनीतादिविक्रयः । नवनीते हि जन्तुसमूर्च्छनं । मधुवसामद्यादौ तु जन्तुघातोद्भवत्वं । मद्येन मदजनकत्वं तद्गतक्रिमिविघातश्चेति तद्विक्रयस्य दुष्टत्वं ॥ १५ ॥

इति केचित् एवं सिताम्बराचार्या ब्रुवते । न तच्चारु तदसुन्दरं । कुत अगण्यत्वात् परिसंख्यातुमशक्यत्वात् । केषां सावद्यकर्मणां सपापक्रियाणां । क्व लोके व्यवहारार्थिजने वर्तमानानां । प्रणेयं वा प्रतिपाद्यं वा । किं तत् तदपि खरकर्मव्रतमपि । कथं प्रति उद्दिश्य । कान् अतिजडान् अतिमुग्धबुद्धीन् । जडान् प्रति त्रसबहुघातेत्यादिनैवोक्तत्वादिति भावः ॥ इति गुणव्रतप्रकरणम् ॥

**अर्थ**— व्रत करणाऱ्या श्रावकानें ह्या भोगोपभोगपरिमाणव्रतांत ज्यापासून कोणत्याही जीवांस पीडा होईल अशा प्रकारचा क्रूरकर्मांचा त्याग करावा. आणि वनजीविका, अग्निजीविका, अनोजीविका, भाटकजीविका, यंत्रपीडन, निर्लांछन, असतीपोष, सरःशोष, दवप्रदा, ज्यापासून कोणत्याही जीवांस पीडा होईल अशा प्रकारचें विषवाणिज्य, लाक्षावाणिज्य, दन्तवाणिज्य, केशवाणिज्य आणि रसवाणिज्य ह्या कर्मादानसंज्ञक पंधरा मलांचा- ( दुष्कर्मांचा )-ही त्याग करावा. असें कित्ये-

कांचें (सितांबराचार्यांचें) ह्मणणें आहे. परंतु त्यांत मुळींच चमत्कार नाहीं.

कारण, जगांत दुष्कर्में इतकींच आहेत (पंधराच आहेत) अशी संख्या ठरवितां येत नाहीं. बरें, अति मंदबुद्धी अशा लोकांस 'अमुक व्यापार दुष्कर्म आहे, असें समजण्याकरितां हें वरील सितांबराचार्यांचें पांडित्य आहे ह्मणावें तर, पूर्वीं (पलमधुमद्यवदखिल ह्या श्लोकांत) 'त्रसजीव व स्थावरजीव ह्यांची ज्यापासून हिंसा होईल अशा प्रकारचे व्यापार ह्मणजे द्रव्यलाभाकरितां करावीं लागणारीं क्रूरकर्में ह्यांचा त्याग करावा' असें सांगितलें असल्यानें सितांबराचार्यांच्या ह्मणण्याचा ह्यांत स्पष्टच समावेश होतो आहे. ह्मणून वरील विवेचन निष्फल ठरतें. आतां अतिमंदबुद्धिजीवांस ज्ञान होण्याकरितांच जर तें विवेचन असेल, तर मात्र आमची हरकत नाहीं. ह्यांतील शब्दांचे अर्थ—

१ 'वनजीविका' ह्मणजे तोडलेल्या किंवा न तोडलेल्या वनस्पती विकून, अथवा गहूं, जोंधळे वगैरे धान्यें दळून किंवा कांडून उपजीविका करणें. ह्या व्यापारांत त्रसजीवांची हिंसा होते हें व्यक्तच आहे.

२ 'अग्निजीविका' ह्मणजे, सहा प्रकारच्या जीवनिकायांस पीडा करणाऱ्या 'अग्नि पेटविणें' ह्या क्रियेनें जीवन करणें. ह्यास अंगारजीविका असें दुसरें नांव आहे.

३ 'शकटजीविका' ह्मणजे, गाडी रथ इत्यादिकांचीं चाकें वगैरे सामान, आपण स्वतः तयार करून, अथवा दुसऱ्याकडून तयार करवून ते विकून उपजीविका करणें. ह्यापासून अनेक जीवांचा घात होतो, तसेंच

बैल वगैरेंचे बंधनादि व्यापारहि करावे लागत असल्यानें त्यांनाहि पीडा होते. हें स्पष्ट आहे.

४ ' स्फोटजीविका ' ह्मणजे, ज्यापासून पृथ्वी-कायिकादि जीवांचा नाश होतो असे किल्ले बांधणें, भिंती बांधणें वगैरे व्यापार करून उपजीविका करणें.

५ ' भाटकजीविका ' ह्मणजे, गाडी वगैरेवरून ओझें वाहून त्याबद्दल भाडें घेऊन जीवन करणें.

६ ' यंत्रपीडन ' ह्मणजे तीळ वगैरे पदार्थ यंत्रांत घालून, त्यांस रगडणें. किंवा दुसऱ्याकडून तसें कराविणें ह्या व्यापारांत तिळादिकांस रगडण्यानें त्यांत असलेल्या त्रसजीवांची हिंसा होते. ह्मणून, हा व्यापार दुष्कर्म आहे.

७ ' निर्लांछन ' शरीराच्या अवयवांचा छेद किंवा भेद करणें. उदाहरण बैलाचें नाक टोंचणें, मुलांचे कान टोंचणें वगैरे.

८ ' असतीपोष ' ह्मणजे दुसऱ्या प्राण्यास मारणारे असे मांजर, कुत्रे वगैरे प्राणी बाळगणें किंवा जीच्यावर कोणत्याही प्रकारानें भाडें उत्पन्न करितां येईल अशी एखादी दासी बाळगणें.

९ ' सरःशोष ' ह्मणजे धान्य पिकविणें वगैरे कामां-करितां एखाद्या तलाव, विहीर, आड इत्यादि जलाशयां-तून, मोरीनें अथवा दुसऱ्या कोणत्याहि उपायानें पाणी काढून घेणें. हा व्यापार केल्यानें जलकायिकजीव व जलांत असलेले त्रसजीव आणि जलाच्या योगानेंच ज्यांचें जीवन होतें असे दुसरे जीव ( मासे वगैरे ) इतक्यांची हिंसा होते. ह्मणून, हा व्यापारही दुष्ट आहे.

१० ‘ दवप्रदा ’ ह्मणजे, रानांतील गवत वगैरे जळून जावें ह्मणून, वणवा पेटविणें. हें दोन प्रकारांनीं संभवतें. एक व्यसनानें ( संवयीमुळें ) उदाहरण आपला कोणत्याही प्रकारचा फायदा नसतां रानांतील लोकांकडून रान पेटविणें. आणि दुसरें पुण्यबुद्धीनें. उदाहरण; कांहीं मादकद्रव्य सेवन केल्यानें मृत्यु प्राप्त झाला असतां त्यावेळीं एखादा मनुष्य अविचारानें असें ह्मणतो कीं माझ्या पारलौकिककल्याणाकरितां इतके दीपोत्सव करावेत. तसेंच एखाद्यानें हें तृण जाळून टाकिलें असतां पुनः नवीन अंकुर फुटून त्यांत पशू चरतील अशा समजुतीनें रान पेटाविणें. किंवा धान्य यावें ह्मणून जमीन जाळणें इत्यादि. ह्यांत जीवनाश स्पष्टच आहे.

११ ‘ विषवाणिज्य ’ ह्मणजे, जीवघातास साधनीभूत असलेल्या विषादि वस्तूंचा विक्रय.

१२ ‘ लाक्षावाणिज्य ’ ह्मणजे, लाख वगैरे वस्तूंचा विक्रय. ह्यांत लाख ही तिचें उत्पत्तिस्थान जें झाड त्यापासून काढावी लागते. आणि ती काढण्याच्या वेळीं अनेक त्रसजीवांचा घात होतो. तसेंच अनंतकायिक जीवस्वरूप असलेल्या पानांचाहि नाश होतो. ‘ लाक्षावाणिज्य ’ ह्या शब्दांतील ‘ लाक्षा ’ शब्दानें केवल लाख ह्याच अर्थाचें ग्रहण करावयाचें नसून लाक्षेप्रमाणेंच ज्यापासून जीवहिंसा होणें शक्य आहे अशा दुसऱ्याही कित्येक वस्तूंचें ग्रहण करावयाचें आहे. ह्मणजे लाक्षा शब्दाचा अर्थ लाक्षा व लाक्षेप्रमाणेंच असलेल्या दुसऱ्या कित्येक वस्तू असा करावयाचा आहे. तशा प्रकारच्या

दुसऱ्या वस्तू ह्मणजे डिंक, टाकणखार, मनशीळ वगैरे पदार्थ काढावयाच्या वेळीं देखील ह्या पदार्थांस चिकटून असलेल्या त्रसजीवांचा वध होतो. तसेंच गुग्गुळ हा जीवहिंसेवांचून होतच नाहीं, असा आहे. व धायटीचीं फुलें हीं मद्य करण्यास उपयोगीं पडतात. मिळून हे सर्व पदार्थ हिंसेला साधनीभूत आहेत, ह्मणून ह्यांच्या विक्र-यानें पापास्रव होतो.

१३ 'दंतवाणिज्य' हस्तिदंत, वाघनखें वगैरे पदार्थ ज्या ठिकाणीं हस्तींचीं अरण्यें असतील व वाघाचीं जंगलें असतील त्या ठिकाणीं, दुसऱ्यास विकण्याकरितां त्या त्या जनावरांची शिकार करणाऱ्या लोकांकडून विकत घेणें. असें केलें असतां ते शिकार करणारे भिल्ल कोळी वगैरे लोक, ह्या पदार्थांच्या विक्रीकरितां त्या त्या पशूंचा वध करितात. व तें कृत्य त्यांजकडून आपण करविल्या-सारखें होतें. ज्या ठिकाणीं ह्या जनावरांचीं अरण्यें नसतील अशा ठिकाणीं वरील पदार्थ विकत घेऊन दुस-ऱ्यास विकले असतां दोष नाहीं. कारण ज्या ठिकाणीं तशीं अरण्यें नसतील त्या ठिकाणीं हे पदार्थ मिळावयाचे ह्मणजे ते पशू— आपोआप मेल्यावांचून मिळावयाचे नाहींत. ह्मणून, त्यापासून हिंसेला मदत केल्यासारखें होत नाहीं.

१४ 'केशवाणिज्य' ह्मणजे, मनुष्य, पशू वगैरे प्राणी विकणें. ह्यांत त्या जीवांस परतंत्र रहावें लागतें, व त्यांचा वध किंवा बंधन हींहि होतात, आणि त्यांना क्षुधा, तृषा वगैरेंची पीडा होते.

१५ 'रसवाणिज्य' ह्मणजे, लोणी वगैरे पदार्थ विकणें. लोण्यांत अनंत त्रसजीवांची व्याप्ती असते, हें प्रसिद्ध आहे. मध, मेंदू व चरबी हे पदार्थ प्राणिवध केल्यावांचून मिळत नाहींत. आणि मद्य हें भ्रांति उत्पन्न करणारें आहे. ह्मणून हे पदार्थ विकूं नयेत.

अथ शिक्षाव्रतविधानार्थमाह --

आतां; शिक्षाव्रतांच्या कर्तव्याविषयीं सांगतात.

शिक्षाव्रतानि देशाव- ।
काशिकादीनि संश्रयेत् ॥
श्रुतचक्षुस्तानि शिक्षा- ।
प्रधानानि व्रतानि हि ॥ २४ ॥

टीका—संश्रयेत् प्रतिपद्येत श्रावकः । कानि शिक्षाव्रतानि शिक्षा विद्योपादानं, शिक्षाप्रधानानि व्रतानि शिक्षाव्रतानि । किंविशिष्टानि देशावकाशिकादीनि देशावकाशिकं, सामयिकं, प्रोषधोपवासं, अतिथिसंविभागं च । कथम्भूतो भूत्वा श्रुतचक्षुः श्रुतज्ञानलोचनः । कुत इत्याह– हि यस्मात् । भवन्ति । कानि तानि व्रतानि । किंविशिष्टानि शिक्षाप्रधानानि ॥

अर्थः—शास्त्रज्ञानरूपी नेत्र ज्याला प्राप्त झाले आहेत ( ज्याला शास्त्रज्ञान आहे ) अशा श्रावकानें, देशावकाशिक वगैरे शिक्षाव्रतें अवश्य स्वीकारावींत. तीं व्रतें ज्यांत विद्यासंपादन करणें हें कृत्य मुख्य आहे अशीं आहेत.

देशावकाशिकं निरुक्त्या लक्षयति—

आतां; देशावकाशिक शब्दाचा अर्थ दाखवून, त्याचें स्वरूप दाखवितात.

दिग्व्रतपरिमितदेशवि- ।
भागेऽवस्थानमस्ति मितसमयम् ॥
यत्र निराहुर्देशा- ।
वकाशिकं तद्व्रतं तज्ज्ञाः ॥ २५ ॥

टीका—निराहुः प्रकृतिप्रत्ययादिविभागेन निश्चितं ब्रुवन्ति । के तज्ज्ञाः तद्व्रतनिर्वचनविदः । किं तद्व्रतं । किमाख्यं देशावकाशिकं देशे दिग्व्रतगृहीतपरिमाणस्य क्षेत्रस्य विभागे अवकाशोऽवस्थानं देशावकाशः, सोऽस्मिन्नस्तीति । यत्र यस्मिन् व्रते । अस्ति विद्यते । किं तदवस्थानमवस्थितिः श्रावकस्य । क्व दिगित्यादि—दिग्व्रते परिमितः प्रतिपन्नपरिमाणो देशः क्षेत्रं दिग्व्रतपरिमितदेशस्तस्य विभागस्तत्काले स्वावस्थानविषयीकृतोंऽशस्तस्मिन् । किंविशिष्टमवस्थानं मितसमयं परिमितकालं ॥

अर्थः—ज्या व्रतांत दिग्व्रतामुळें संकुचित केलेल्या प्रदेशांतील एका विभागांतच कांहीं परिमित कालपर्यंत राहावयाचें असतें, त्या व्रतास,—त्या व्रताचें स्वरूप ज्यांना माहीत आहे अशा प्रकारचे लोक, 'देशावकाशिकव्रत' असें ह्मणतात.

तद्व्रतयुक्तं लक्षयति—

आतां; देशावकाशिकव्रती कोणास ह्मणावें तें सांगतात.

स्थास्यामीदमिदं याव- ।
दियत्कालमिहास्पदे ॥
इति सङ्कल्प्य सन्तुष्ट- ।
स्तिष्ठन्देशावकाशिकी ॥ २६ ॥

टीका—भवति । कोऽसौ श्रावकः । किंविशिष्टो देशावकाशिकी । किं कुर्वन् तिष्ठन् लक्षणहेत्वोः क्रियाया इति शतृच् । कालपरिच्छित्त्या नियतदेशे सन्तुष्टतयाऽवस्थानेन देशावकाशिकव्रतित्वपरिमाणस्य लक्ष्यमाणत्वात् । किं कृत्वा सङ्कल्प्य मनसा सम्प्रधार्य । कथं इति । किमिति स्थास्यामि स्थितिं करिष्याम्यहं । क इहास्मिन्नास्पदे स्थाने । कथं इदमिदं यावत् गृहगिरिग्रामादिमवधिं कृत्वा । कियत्कालं इयत्कालं घाटिकादिप्रहरदिनादिमात्रं । किंविशिष्टः सन् सन्तुष्टः सीमभ्यो बहिर्निगृहीततृष्णः सन् । दिग्व्रतवदस्यापि नियमितदेशाद्बहिर्लोभनिग्रहेण हिंसादीनां च सर्वशो निवर्तनेनात्र फलवत्त्वात् अमुत्रानैश्वर्यसम्पादकत्वाच्च सुतरां करणीयत्वं । शिक्षाव्रतत्वं चास्य शिक्षाप्रधानत्वात्परिमितकालभावित्वाच्चोच्यते । न खल्वेतद्दिग्व्रतवद्यावज्जीविकमपीष्यते ॥ यत्तु तत्त्वार्थादौ गुणव्रतत्वमस्य श्रूयते तद्दिग्व्रतसंक्षेपणलक्षणत्वमात्रस्यैव विवक्षितत्वाल्लक्ष्यते । दिग्व्रतसंक्षेपकरणं चात्रागुणव्रतादिसंक्षेपकारणस्याप्युपलक्षणं द्रष्टव्यं । एषामपि संक्षेपस्यावश्यकर्तव्यत्वात्प्रतिव्रतं च संक्षेपकरणस्य । भिन्नव्रतत्वे गुणाः स्युर्द्वादशेति संख्याविरोधः स्यात् ॥

**अर्थः— ' अमुक मर्यादेच्या आंतील ह्या स्थानावर, मी इतका कालपर्यंत राहीन ' असा मनाचा निश्चय करून जो श्रावक संतुष्ट ( मर्यादेच्या बाहेर जाण्याविषयीं इच्छा न करणारा ) असा रहातो, तो श्रावक, देशावकाशिकव्रत करणारा होय.**

तद्व्रतातिचारत्यागार्थमाह—

**आतां ह्या व्रताच्या अतीचारांचा त्याग करण्याकरितां सांगतात.**

पुद्गलक्षेपणं शद्ब- ।
श्रावणं स्वाङ्गदर्शनम् ॥
प्रैषं सीमबहिर्देशे ।
ततश्चानयनं त्यजेत् ॥ २७ ॥

टीका—त्यजेत् तद्व्रतनैर्मल्यार्थी । किं पुद्गलक्षेपणादिपञ्चकं । तत्र पुद्गलक्षेपणं परिगृहीतदेशाद्बहिः स्वयमगमनात्कार्यार्थितया व्यापारकारकाणां चोदनाय लोष्टादिप्रेरणं ॥१॥ शद्बश्रावणं शद्बस्याभ्युत्काशिकादेः श्रावणमाव्हानीयानां श्रोत्रेऽनुपातनं । शद्बानुपातनं नामातिचारमित्यर्थः ॥ २ ॥ स्वाङ्गदर्शनं शद्बोच्चारणं विना आव्हानीयानां दृष्टौ स्वरूपस्यानुपातनं रूपानुपाताख्यमतिचारं । एतत् त्रयं मायावितयाऽतिचारत्वं याति ॥ ३ ॥ प्रैषं मर्यादीकृतदेशे स्थित्वा ततो बहिःप्रेष्यं प्रत्येवं कुर्विति व्यापारणं । देशावकाशिकव्रतं हि मा भूद्गमनागमनादिव्यापारजनितः प्राण्युपमर्द इत्यभिप्रायेण गृह्यते । स तु स्वयंकृतोऽन्येन कारित इति न कश्चित्फलविशेषः । प्रत्युत स्वयं गमने ईर्यापथविशुद्धेर्गुणः । परस्य पुनरनिपुणत्वादीर्यासमित्यभावे दोष इति प्रेष्यप्रयोगं नाम चतुर्थमतिचारं त्यजेदिति सर्वत्र योज्यम् ॥ ४ ॥ ततश्चानयनं सीमबहिर्देशादिष्टवस्तुनः प्रेष्येण विवक्षितक्षेत्रे प्रापणं । चशद्बेन सीमबहिर्देशे स्थितं प्रेष्यं प्रति इदं कुर्वित्याज्ञापनं वा । एतौ चाव्युत्पन्नबुद्धितया सहसाकारादिना वाऽतिचारौ स्तः । सर्वत्र च– सापेक्षस्य व्रते हि स्यादतिचारोंऽशभञ्जनम्– इत्युपजीवम् ॥

अर्थः—देशावकाशिकव्रत करणाऱ्या श्रावकानें पुद्गलक्षेपण वगैरे पांच क्रियांचा त्याग करावा. (कारण त्या क्रिया केल्यानें व्रताचा अतीचार होतो.) त्या पांच क्रिया येणेप्रमाणें.

१ ‘ पुद्गलक्षेपण ’ ह्मणजे, नियमित प्रदेशाच्या बाहेर असलेल्या लोकांस कांहीं काम करावयास लावण्याच्या हेतूनें त्यांना सुचविण्याकरितां, आपण बसलेल्या जाग्या-वरून ढेंकूळ, दगड वगैरे फेंकणें.

२ ‘ शब्दश्रावण ’ ह्मणजे, आपल्या मर्यादेच्या बाहेर असलेल्या लोकांस आपल्याकडे बोलावण्याच्या हेतूनें त्यांना ऐकूं जाईल अशा रीतीनें चिटकी, टाळी वगैरे वाजविणें. ह्यालाच शब्दानुपातन नांवाचा अतीचार असेंही ह्मणतात.

३ ‘ स्वांगदर्शन ’ ह्मणजे, आपण बोलावितों असें समजविण्याकरितां, शब्दोच्चार न होऊं देतां, ज्यास बोल-वावयाचें असेल त्यास आपलें शरीर अथवा शरीराचा अवयव दाखविणें ( आपण त्याच्या दृष्टी पडणें ) ह्यास रूपानुपातनातीचार असेंहि ह्मणतात. हे तीनहि व्यापार ते करणाऱ्याच्या मनांत जर कांहीं कपट असेल तरच अतीचार समजावेत; आणि जर कांहीं कपट नसेल– तर ( ते व्यापार सहज घडले असतील तर ) अतीचार होत नाहींत. हा ह्यांत विशेष आहे.

४ ‘ प्रेष ’ ह्मणजे, आपण पूर्वीं मर्यादित केलेल्या प्रदेशांत राहून, सीमेच्या बाहेरील प्रदेशांत असलेलें आपलें काम करण्याविषयीं ‘ हें काम कर ’ अशी सेवकास आज्ञा करणें. वस्तुतः पाहिलें असतां, व्रत हें येणें जाणें ह्या व्यापारांनीं हिंसा होऊं नये अशा अभिप्रायानें स्वीकारलेलें असतें. ती हिंसा आपण करण्यांत आणि दुसऱ्याकडून करविण्यांत दोष अधिक आहे. कारण

व्रती श्रावकानें मर्यादातिक्रम केला असतां ईर्यापथशुद्धि केली असल्यानें दोष कमी संभवतो. आणि दुसऱ्याकडून करविण्यांत ईर्यासमिति नसल्यानें दोष अधिक होतो. ह्यालाच 'प्रेष्यप्रयोग' असेंहि ह्मणतात. ५ 'आनयनं' ह्मणजे आपल्यास इष्ट असलेली कोणतीहि वस्तू, सीमेच्या बाहेर असल्यास दुसऱ्याकडून आपल्या सीमेंत आणणें किंवा 'सीमेच्या बाहेरील वस्तू आंत आण' असें सेवकांस सांगणें. चवथा व पांचवा हे दोन अतीचार, धर्माचें ज्ञान चांगलें नसल्यामुळें, किंवा अविचारामुळें होतात. वरील पांचहि क्रिया व्रतसापेक्षश्रावकाकडून जर घडल्या असतील तरच त्या अतिचारस्वरूप होतात, आणि जर व्रतापेक्षा नसेल तर व्रतभंग होतो.

अप्ररूपितस्वरूपस्यानुष्ठानं न स्यादिति सामायिकस्वरूपं प्ररूपयति—

आतां; ज्याचें स्वरूप समजलें नाहीं तें कृत्य होणें शक्य नाहीं, ह्मणून, प्रथम सामायिकाचें स्वरूप दाखवितात.

एकान्ते केशबन्धादि- ।
मोक्षं यावन्मुनेरिव ॥
स्वं ध्यातुः सर्वहिंसादि- ।
त्यागः सामायिकव्रतम् ॥ २८ ॥

टीका—भवति । किं तत् सामायिकव्रतं समस्य रागद्वेषविमुक्तस्य सतः अयो ज्ञानादीनां लाभः प्रशमसुखरूपः स समायः, समाय एव सामायः सामायः प्रयोजनमस्येति वा सामायिकं

रागद्वेषहेतुषु मध्यस्थतेत्यर्थः । अथवा समय आप्तसेवोपदेशस्तत्र नियुक्तं कर्म सामायिकं व्यवहारेण जिनस्नपनार्चास्तुतिजपाः । निश्चयेन च स्वात्मध्यानमेव सामायिकं । सामायिकमेव व्रतं सामायिकव्रतं । किं सर्वहिंसात्यागः सर्वत्र सर्वेषां च हिंसादीनां प्रमत्तयोगभाविनां प्राणव्यपरोपणादिपञ्चपापानां त्यागः परिहारः । सर्वत्रेति व्याख्यानाद्देशावकाशिकादस्य भेदः सूच्यते । कस्य शिक्षाव्रतिनः । किंविशिष्टस्य ध्यातुः साधुत्वेन ताच्छील्येन वा ध्यायतः । कं स्वमात्मानं अन्तर्मुहूर्तमात्रं धर्म्यध्यानानिष्ठस्येत्यर्थः । कस्येव मुनेरिव सर्वारम्भपरिग्रहाग्रहरहितत्वाद्यतिना तुल्यस्य । क एकान्ते विविक्तस्थाने । कियत्कालं केशबन्धादिमोक्षं यावत् केशबन्ध आदिर्येषां मुष्टिबन्धवस्त्रग्रन्थ्यादीनां गृहीतनियमकालावच्छेदहेतूनां ते केशबन्धादयः तेषां मोक्षो मोचनं तमवधीकृत्य स्थितस्येत्यर्थः । सामायिकं हि चिकीर्षुर्यावदयं केशबन्धो वस्त्रग्रन्थ्यादिर्वा मया न मोच्यते तावत्साम्यान्न प्रचलिष्यामीति प्रतिज्ञां करोति ॥ [ साधुत्वेनेत्यत्र साकल्येनेति पाठभेदः ]

अर्थः—एकांतस्थलीं केशांस गांठ बांधल्यापासून ती सोडीपर्यंत एखाद्या मुनीप्रमाणें आत्मचिंतन करणाऱ्या श्रावकाचा जो सर्वत्र हिंसेचा त्याग होतो, त्यास ' सामायिकव्रत ' किंवा सामयिक असें ह्मणतात.

ह्याचें स्पष्टीकरण—सामायिक शद्बाचा मुख्य अर्थ— शांतीपासून उत्पन्न होणारें सुख देणारी अशी " प्रिय व अप्रिय ह्या दोहों प्रकारच्या वस्तूंविषयीं " समता ठेवणें, असा होतो. व सामायिकशद्बाचा आप्तोपदेशांत सांगितलेलें कर्म ( श्रीजिनाचें स्तवन, अर्चन, जप वगैरे ) अथवा आत्मध्यानरूप कर्म असा अर्थ होतो.

आतां वरील श्लोकांत जो सामायिक शब्द आहे तो आम्ही स्पष्टीकरणांत दाखविलेल्या अर्थी नसून 'सर्वत्र हिंसेचा त्याग करणें, ह्या अर्थी आहे. तेव्हां अर्थात् ही गोष्ट सिद्ध आहे कीं; हा जो श्लोकांत सामायिक शब्दाचा प्रयोग आहे, तो मुख्यार्थी नसून पारिभाषिकार्थी आहे. ह्मणून श्लोकार्थांत जो सामायिक शब्दाचा अर्थ दाखविला आहे तो पारिभाषिक अर्थ आहे असें समजावें. ह्या हिंसात्यागाचा काल श्लोकांत 'केशबन्धादिमोक्षं यावत् (केशांस गांठ बांधणें किंवा वस्त्रास गांठ बांधणें अथवा मुष्टिबंध करणें वगैरे केल्यापासून तें सोडीपर्यंत)' असा सांगितला आहे. त्याचें तात्पर्य असें आहे कीं—सामायिक करण्यास तयार झालेल्या श्रावकानें आरंभीं 'ही केशांची गांठ अथवा वस्त्राची गांठ मी स्वतः सोडीपर्यंत समता ठेवीन' अशी प्रतिज्ञा करावी लागते.

ह्या प्रतिज्ञेनें असें होतें कीं— जितका कालपर्यंत आपली तशी समता रहात आहे, तितका कालपर्यंतच सामायिक-व्रत करितां येतें. आणि समतेंत चंचलपणा येण्याबरोबर व्रताचा विसर्ग करितां येतो. तसेंच जर समता पुष्कळ वेळ ह्मणजे तास, दोन तास, प्रहर, दिवस वगैरे कितीही कालपर्यंत— राहील, तर, गांठ सोडणें आपल्या आधीन असल्यामुळें पाहिजे तितका काल वाढवितां येतो.

सामायिकभावनासमयं नियमयन्नाह—

**आतां; सामायिकाच्या अभ्यासाचा नियमित काळ सांगतात.**

परं तदेव मुक्त्यङ्ग- ।
मिति नित्यमतन्द्रितः ॥
नक्तं दिनान्तेऽवश्यं त- ।
द्भावयेच्छक्तितोऽन्यदा ॥ २१ ॥

टीका—भावयेदभ्यस्येन्मुमुक्षुः । किं तत्सामायिकव्रतं । क नक्तंदिनान्ते नक्तं च दिनं च नक्तंदिने तयोरन्ते निशावसाने दिवसावसाने चेत्यर्थः । कथमवश्यं नियमेन । अथवा नास्ति वश्यं व्याध्यादिपारतन्त्र्यं यत्र भावनकर्मणि तदवश्यं यथा भवति। किंविशिष्टः सन् अतन्द्रितः अनलसः । कथं नित्यं सर्वकालं । कुतो हेतोः इति यतो भवति । किं तत् तदेव सामायिकमेव । किंविशिष्टं मुक्त्यङ्गं मोक्षसाधनं । किंविशिष्टं परमुत्कृष्टं । परमप्रकर्षप्राप्तचारित्रस्यैव साक्षान्मोक्षहेतुत्वसिद्धेः ॥ एवं तर्हि मध्याह्नादौ तन्न भावयितव्यमिति शङ्कायामिदमाह— शक्तितोऽन्यदेति । भावयेन्मुमुक्षुस्तत् । कदाऽन्यदाऽन्यस्मिन्मध्याह्नादौ काले । कथं शक्तितः स्वशक्तिमपेक्ष्य । नियमकालादन्यदाऽपि तद्भावने दोषाभावाद्गुणसद्भावाच्च ॥

अर्थः—तें सामायिकव्रतच मुक्तीचें मुख्य साधन आहे; ह्याकरितां, श्रावकानें आळस न करतां, दररोज रात्रीच्या समाप्तीच्या वेळीं ( पहाटेस ) व दिवसाच्या समाप्तीच्या वेळीं ( सायंकाळीं ) त्याचा अभ्यास अवश्य करावा! आणि बाकीच्या वेळीं आपल्या शक्तीप्रमाणें ( अंतःकरणाचा ) उत्साह जितका असेल त्याप्रमाणें त्याचा अभ्यास करावा.

सामायिकस्थेन परीषहोपसर्गोपनिपाते सति तयोर्जयार्थं किं ध्यातव्यमित्याह—

आतां; सामायिकव्रत करणाऱ्या श्रावकानें, परीषहांची पीडा उत्पन्न झाली असतां तिचा नाश करण्यास कशाचें चिंतन करावें, तें सांगतात.

मोक्ष आत्मा सुखं नित्यः ।
शुभः शरणमन्यथा ॥
भवोऽस्मिन्वसतो मेऽन्य- ।
त्किं स्यादित्यापदि स्मरेत् ॥ ३० ॥

टीका—स्मरेत् ध्यायेत् । कोऽसौ प्रतिपन्नसामायिकः । किं तत् इति एतत् । कस्यां सत्यां आपदि विनिपाते परीषहोपसर्ग-संसर्गे इत्यर्थः । एतेन प्रतिपन्नसामायिकेन परीषहोपसर्गाः सोढव्या इत्याक्षिप्यते । किमेतदित्याह— भवति । कोऽसौ मोक्षः । किं आत्मा अनन्तज्ञानादिरूपत्वात् । तथा सुखं अनाकुलचिद्रूपत्वात् । तथा नित्यः अनन्तकालभाविप्रध्वंसाभावरूपत्वात् । तथा शुभः शुभकारणप्रभवत्वाच्छुभकार्यत्वाच्च । तथा शरणं समस्तविपदगम्य-तया अपायपरिरक्षणोपायत्वात् । संसारः किंरूप इत्याह— अस्ति । कोऽसौ भवः स्वोपात्तकर्मोदयवशाच्चतुर्गतिविवर्तपरिवर्तनं । कथम-न्यथा मोक्षविपरीतलक्षणः अनात्मा दुःखमनित्योऽशरणमित्यर्थः । अस्मिँश्च भवे । वसतोऽवतिष्ठमानस्य मम किमन्यत्सुखदुःखादि स्यादभूदस्ति भाविष्यति च किन्त्वापात एव पुनःपुनर्भवेदित्यर्थः ॥

अर्थः— मोक्ष हा अनंतज्ञानादिरूप असल्यानें आत्मस्वरूप आहे, तसेंच तो निरुपाधिचित्स्वरूप असल्यानें सुखस्वरूप

आहे, नित्य आहे, शुभकर्मापासून प्राप्त होणारा असल्यानें शुभ आहे, तो सर्वप्रकारच्या विपत्तींना अगम्य असल्यानें शरण ह्मणजे सर्वविपत्तीपासून रक्षण करणारा आहे. आणि संसार हा त्याच्या अगदीं विरुद्ध ह्मणजे अनात्मा, दुःखरूप, अनित्य, अशुभ व अशरण असा आहे. अशा ह्या संसारांत राहणाऱ्या मला दुसरें काय प्राप्त व्हावयाचें आहे! तर वारंवार दुःखच प्राप्त व्हावयाचें आहे!! असें, विपत्तींत श्रावकानें चिंतन करावें.

सामायिकसिध्द्यर्थमन्यत्र श्रावकेण किं कर्तव्यमित्यत्राह—

आतां; सामायिकाचे सिद्धीकरितां दुसऱ्या वेळीं श्रावकानें काय करावें ह्याविषयीं सांगतात—

स्नपनार्चास्तुतिजपान् ।
साम्यार्थं प्रतिमार्पिते ॥
युञ्ज्याद्यथाम्नायमाद्या- ।
दृते सङ्कल्पितेऽर्हति ॥ ३१ ॥

टीका—युञ्ज्यात्प्रयोजयेत् मुमुक्षुः । कान् स्नपनार्चास्तुतिजपान् स्नपनमाश्रुत्येद्यादौ व्याख्यास्यते, अर्चादयो ज्ञानदीपिकायामत्र च प्राग्यथास्थानं व्याख्याताः । क स्नपनादीन् युञ्ज्यात् अर्हति भगवदर्हद्देवे । किंविशिष्टे प्रतिमार्पिते साकारस्थापनामवतारिते । कथं यथाम्नायं उपासकाध्ययनाद्यागमानतिक्रमेण । किमर्थं साम्यार्थं परमार्थसामायिकसिध्द्यर्थं अन्यत्र किं प्रयोक्तव्यमित्याह— आद्यादित्यादि— युञ्ज्यात्साम्यार्थी । किं तत् आद्यात्स्नपनात् । ऋते विना अन्यदर्चादित्रयं । क अर्हति । किंविशिष्टे

सङ्कल्पिते निराकारस्थापनार्पिते । एतेन कृतप्रतिमापरिग्रहाः सङ्कल्पिताप्तपूजाग्रहाश्चेति द्वये देवसेवाधिऽकृता इति सूच्यते ॥

अर्थ—मुक्त होण्याची इच्छा करणाऱ्या श्रावकानें, प्रतिमेवर आवाहन केलेल्या अर्हत् देवाचे ठिकाणीं स्नान घालणें, पूजा करणें, स्तुति करणें व जप करणें ह्यांचा उपयोग, यथाशास्त्र करावा. आणि मनानें कल्पिलेल्या ( निराकार अशा ) अर्हद्देवाचे ठिकाणीं पहिल्या क्रियेवांचून ( स्नान घालणें ह्या क्रियेवांचून ) बाकीच्यांचा—ह्मणजे पूजा ( मानसपूजा ) स्तुति, जप ह्यांचा यथाशास्त्र उपयोग करावा. ( ह्या क्रिया निराकारास उद्देशून कराव्या. )

सामायिकस्य सुदुष्करत्वशङ्कामपाकरोति—

आतां; 'सामायिक हें दुष्कर आहे' अशा शंकेचें निवारण करतात.

सामायिकं सुदुःसाध- ।
मप्यभ्यासेन साध्यते ॥
निम्नीकरोति वार्बिन्दुः ।
किं नाश्मानं मुहुः पतन् ॥ ३२ ॥

टीका—साध्यते निष्पाद्यते । किं तत् सामायिकं । केन अभ्यासेन असकृत्प्रवृत्या । किंविशिष्टमपि दुःसाधमपि अतिशयेन निष्पादयितुमशक्यमपि । अत्र दृष्टान्तमाह— किं न निम्नीकरोति अनिम्नं निम्नं करोति । कोऽसौ वार्बिन्दुः । जलबिन्दुः । कम-श्मानं शिलां । किं कुर्वन् पतन् । कथं मुहुर्वारंवारं । अत्र बाह्या

अप्याहुः– अभ्यासो हि कर्मणां कौशलमावहति । न हि सकृन्निपातमात्रेणोदबिन्दुरपि ग्राविणि निम्नतामादधातीति ॥

**अर्थः—सामायिकव्रत करण्यास जरी कठीण आहे तथापि अभ्यासानें साधिता येतें. वारंवार पडणारा पाण्याचा थेंब दगडास देखील खळगा पाडीत नाहीं काय?**

तदतिचारपरिहारार्थमाह—

**आतां; त्याच्या अतीचारांचा त्याग करण्याविषयीं सांगतात.**

**पञ्चात्रापि मलानुज्झे- ।**
**दनुपस्थापनं स्मृतेः ॥**
**कायवाङ्मनसां दुष्ट- ।**
**प्रणिधानान्यनादरम् ॥ ३३ ॥**

**टीका**—उज्झेत् त्यजेत् । फलार्थी । कान् पञ्च मलान् । क अत्रापि व्रतान्तरवत्सामायिकेऽपि । किं किं स्मृत्यनुपस्थापनं कायवाङ्मनसां दुष्टप्रणिधानानि त्रीणि, अनादरं च, तत्र स्मृतेरनुपस्थापनं सामायिके अनैकाग्र्यमित्यर्थः । अथवा सामायिकं मया कर्तव्यं न कर्तव्यमिति वा सामायिकं मया कृतं न कृतमिति वेति प्रबलप्रमादादस्मरणमतीचारः । स्मृतिमूलत्वान्मोक्षमार्गानुष्ठानस्य । कायेत्यादि दुष्टप्रणिधानं सावद्ये प्रवर्तनं तत्र हस्तपादादीनामनिश्चलभूतत्वावस्थापनं कायदुष्प्रणिधानं । वर्णसंस्काराद्भावोऽर्थानवगमश्चापलं च वाग्दुष्प्रणिधानं । क्रोधलोभद्रोहाभिमानेर्ष्यादयः कार्येऽव्यासङ्गसम्भ्रमश्च मनोदुष्प्रणिधानं । एते त्रयोऽतीचाराः । मनोदुष्प्रणिधानस्य स्मृत्यनुपस्थापनस्य चायं भेदः क्रोधाद्यावेशात्सामायिके मनसश्चिर-

मनवस्थापनं प्रथमं । चिन्तायाः परिस्पन्दनादैकाग्र्येणानवस्थापनमन्यत् । अनादरोऽनुत्साहः प्रतिनियतवेलायां सामायिकस्याकरणं यथाकथञ्चिद्वा करणं । करणानन्तरमेव भोजनादिव्यासञ्जनं च । न चात्राविधिकृताद्वरमकृतामित्यसूयावचनं प्रमाणीकृत्य भङ्गसम्भावनया सामायिकस्याप्रतिपत्तिः कर्तव्या । यतीनामप्यारम्भे भावितपूर्वत्वादेकदेशविराधनस्य सम्भवात् । न चैतावता तस्य भङ्गोऽपि मनसा सावद्यं न करोमीत्यादिप्रत्याख्यानेष्वेकतरभङ्गेऽपि शेषसद्भावान्न सामायिकस्यात्यन्ताभाव इत्यमीषामतिचारतैव । सुभावितसामायिकस्तु यदा श्रावको भविष्यति तदा तृतीयपदमेवाभ्युपगमिष्यतीति युक्तो व्रतिकस्यातिचारपरिहाराय यत्नः ॥

अर्थः—ह्या सामायिकव्रतांत देखील पांच प्रकारच्या अतीचारांचा श्रावकानें त्याग करावा. त्या अतीचारांस १ स्मृत्यनुपस्थापन, २ कायदुष्प्रणिधान, ३ वाग्दुष्प्रणिधान, ४ मनोदुष्प्रणिधान आणि ५ अनादर अशा संज्ञा आहेत.

ह्याचा अर्थ–' स्मृत्यनुपस्थापन, ह्मणजे सामायिकाविषयीं एकाग्रता नसणें. किंवा मीं सामायिकव्रत करावें किंवा न करावें अशी मनाची द्विधाप्रवृत्ती, अथवा मीं सामायिक केलें किं नाहीं असा संशय, अशा प्रकारची तीव्र प्रमादामुळें सामायिकाविषयीं विस्मृति होणें; हा सामायिकव्रताचा अतीचार आहे. कारण मोक्षप्राप्तीच्या अनुष्ठानांत स्मृति ही अवश्य असलीच पाहिजे. जर स्मृति नसेल तर केलें काय, व करावयाचें काय, ह्याचें अनुसंधान मुळींच रहावयाचें नाहीं.

२ ‘ कायदुष्प्रणिधान ’ ह्मणजे, हात पाय वगैरे अवयव निश्चल व झांकलेले नसणें. ३ वाग्दुष्प्रणिधान, बोबडे शब्द उच्चारणें, अथवा अस्पष्ट शब्द उच्चारणें किंवा त्वरेनें शब्दोच्चार करणें.

३. वाग्दुष्प्रणिधान, बोबडे शब्द उच्चारणें, अथवा अस्पष्ट शब्द उच्चारणें किंवा त्वरेनें शब्दोच्चार करणें.

४ ‘ मनोदुष्प्रणिधान ’– ह्मणजे, क्रोध, लोभ, द्रोह, अभिमान ईर्ष्या वगैरे उत्पन्न होणें. अथवा, एखाद्या कामांत गढून असणें, किंवा अंतःकरणाची व्यग्रता असणें. हे तीन्ही प्रकारचे दुष्प्रणिधान अतीचार होत. आतां येथें असाही एक संशय येतो कीं– मनोदुष्प्रणिधान आणि स्मृत्यनुपस्थापन ह्यांत मुळींच भेद दिसत नाहीं. परंतु, तसें नाहीं, त्या दोहोंत भेद आहे. तो असा कीं, क्रोधादिकांच्या वेगामुळें सामायिकांत मनाचें चांचल्य असणें हें मनोदुष्प्रणिधान, आणि वारंवार एकाप्रकारच्या विचाराच्या ऊर्मी उठत असल्यामुळें जी व्यग्रता असते, तें स्मृत्यनुपस्थापन होय.

५ ‘ अनादर ’ ह्मणजे, सामायिकाविषयीं उत्साह नसणें, व ह्या मुळेंच नियमित वेळीं सामायिक न होणें, किंवा तें हयगयीनें कसेंतरी करणें, अथवा केल्याबरोबर भोजनादिकांची आसक्ती बाळगणें. येथें एक शंका येते, ती अशी कीं–वर जे सामायिक व्रताचे अतीचार सांगितले, त्यापैकीं एखादातरी अतीचार व्रती श्रावकाकडून होणें अगदीं संभवनीय आहे. मग अशा प्रकारें अविधि व्रत केल्यापेक्षां न केलेलें बरें, हें ह्मणणें अगदीं बरोबर

नाहीं. कारण, सामायिकव्रत करण्यास प्रारंभ केल्याबरोबर व्रती मनुष्य यती जरी असला तथापि पूर्वी सामायिकव्रत कधीं केलेलें नसल्यानें त्याच्याकडून देखील वरील अतिचारांपैकीं एखादा अतीचार होऊन, व्रताच्या एकदेशाचा भंग होणें शक्य आहे. मग इतर श्रावकांच्या हातून तसें झालें तर आश्चर्य काय? बरें असें झालें ह्मणून सामायिकव्रताचा सर्वथा भंग होतो असें ह्मणणें बरोबर नाहीं. कारण, व्रती श्रावकानें 'मी मनानें निंद्य कर्म करणार नाहीं' असा पूर्वी संकल्प केला असल्यानें, मानसिक सर्व निंद्यकर्मांचा त्याग केला असें होत असल्यामुळें, जरी एकदेशाचा भंग झाला, तथापि, सर्व व्रताचा भंग होणें शक्य नाहीं. ह्मणूनच वरील व्यापार हे अतिचार आहेत. त्यांच्या योगानें व्रताचा नाश मुळींच होत नाहीं.

ह्यावरून अतिचारांवांचून सामायिक होणें शक्यच जर नाहीं तर त्यांच्या त्यागाकरितां उपदेश करणें व्यर्थ आहे असेंही समजूं नये. कारण, जर श्रावकास निरतिचार सामायिकव्रत साध्य होईल तर तो श्रावक, सामायिक ह्या तिसऱ्या पदवीस प्राप्त होतो. नाहींपेक्षां तो तिसऱ्या पदवीस प्राप्त होतो. नाहींपेक्षां तो तिसऱ्या पदवीस प्राप्त न होतां केवल व्रती मात्र होतो. ह्मणून अतीचारांचा त्याग करणें अगदीं अवश्य आहे.

अथ प्रोषधोपवासव्रतं लक्षयति—

आतां; प्रोषधोपवासव्रताचें लक्षण सांगतात.

स प्रोषधोपवासो य- ।
चतुष्पर्व्यां यथागमम् ॥
साम्यसंस्कारदार्ढ्याय ।
चतुर्भुक्त्युज्झनं सदा ॥ ३४ ॥

टीका—भवति । कोऽसौ सः प्रोषधोपवासः प्रोषधे पर्वण्युपवासः उपवसनं । यत्किं यच्छ्रावकेण क्रियते । किं तत् चतुर्भुक्त्युज्झनं चतसृणां भुक्तीनां भोज्यानामशनस्वाद्यखाद्यपेयद्रव्याणां भुक्तिक्रियाणां च त्यागः । एका हि भुक्तिक्रिया धारणकदिने द्वे उपवासदिने चतुर्थी च पारणकदिने प्रत्याख्यायते । कस्यां चतुष्पर्व्यां चतुर्णां पर्वणां समाहारश्चतुष्पर्वी तस्यां । मासे मासे द्वयोरष्टम्योश्चतुर्दश्योरित्यर्थः । कथं यथागमं आगमानतिक्रमेण । किमर्थं साम्यसंस्कारदार्ढ्याय साम्यस्य सामायिकस्य संस्कार उत्कर्षस्तस्य दार्ढ्यं स्थिरीकरणं परीषहाद्यापातेऽपि अविचलनं तस्मै । कदा सदा सर्वस्मिन् काले यावज्जीवमित्यर्थः ॥

अर्थ— सामायिकाचा संस्कार दृढ व्हावा ह्मणजे—परिषह प्राप्त झाला असतांही मनाच्या साम्यावस्थेंत बिघड येऊं नये ह्याकरितां चारी पर्वांच्या दिवशीं जो चार भोजनांचा यावज्जीव यथाशास्त्र त्याग करावयाचा, त्यास प्रोषधोपवास असें ह्मणतात. पर्वें शुक्लपक्षांतील अष्टमी व चतुर्दशी हीं दोन, व कृष्णपक्षांतील अष्टमी व चतुर्दशी हीं दोन, मिळून चार आहेत. त्यांतील प्रत्येक पर्वासंबंधानें चार भोजनांचा त्याग करावयाचा, ह्मणजे, अष्टमी ह्या पर्वासंबंधानें अष्टमीच्या पूर्वदिवशीं ( सप्तमी दिवशीं ) संध्याकाळचें भोजन, अष्टमी दिवशींचीं दोन भोजनें व

पारणेच्या दिवशीचें ( नवमीच्या दिवशीचें ) एक सायंकाळचें भोजन, अशा चार भोजनांचा त्याग करावा लागतो. याप्रमाणेंच प्रत्येक पर्वासंबंधानें समजावें.

एवमुत्तमं प्रोषधविधानमुक्त्वा मध्यमं जघन्यं च तदुपदेष्टुमाह—

याप्रमाणें उत्तमप्रोषधोपवासाचा विधि सांगून, आतां मध्यम व कनिष्ठ प्रकारच्या प्रोषधोपवासांविषयीं उपदेश करितात.

उपवासाक्षमैः कार्यो ।
ऽनुपवासस्तदक्षमैः ॥
आचाम्लनिर्विकृत्यादि ।
शक्त्या हि श्रेयसे तपः ॥ ३५ ॥

टीका—कार्यः कर्तव्यः । कोऽसावनुपवासः जलवर्जनचतुर्विधाहारत्यागः । ईषदुपवासोऽनुपवास इति व्युत्पत्तेः । कैः उपवासाक्षमैः प्रागुक्तलक्षणमुपवासं कर्तुमसमर्थैः । तथा कार्यं किं तत् आचाम्लनिर्विकृत्यादि । कैः तदक्षमैः अनुपवासमपि कर्तुमसमर्थैः । तत्राचाम्लमसंस्कृतसौवीरमिश्रौदनभोजनं । निर्विकृतिः विक्रियेते जिह्वामनसी येनेति विकृतिर्गोरसेक्षुरसफलरसधान्यरसभेदाच्चतुर्धा । तत्र गोरसः क्षीरघृतादिः, इक्षुरसः खण्डगुडादिः, फलरसो द्राक्षाम्रादिनिष्यन्दो, धान्यरसस्तैलमण्डादिः । अथवा यद्येन सह भुज्यमानं स्वदते तत्तत्र विकृतिरित्युच्यते । विकृतेर्निष्क्रान्तं भोजनं निर्विकृति । आदिशब्देनैकस्थानैकभक्तरसत्यागादि । हि यस्मात् । भवति । किं तत्तपः । कस्मै श्रेयसे पुण्याय वा । कया चरितं शक्त्या बलेन वीर्येण च ॥

अर्थः—वरील श्लोकांत सांगितल्याप्रमाणें उपवास करण्यास असमर्थ असलेल्या श्रावकांनीं अनुपवास (पाण्यावांचून बाकीच्या सर्व भोज्य पदार्थांचा त्याग) करावा. अनुपवासासही असमर्थ असलेल्यांनीं, नुसत्या पेजेबरोबर भात खावा किंवा निर्विकृतिभोजन करावें. कारण आपल्या शक्तीप्रमाणें केलेलें तप, पुण्य अथवा मोक्ष देणारें होतें. (निर्विकृति भोजन ह्मणजे ज्यांत विकृति नाहीं असें अन्न. ह्यांतील विकृति शब्दाचा अर्थ रुचि उत्पन्न करणारे पदार्थ असा आहे. हे पदार्थ गोरस, इक्षुरस, फलरस व धान्यरस असे चार प्रकारचे आहेत. (गोरस ह्मणजे दूध, दही, तूप वगैरे पदार्थ, इक्षुरस ह्मणजे खडीसाखर, गूळ वगैरे पदार्थ. फलरस ह्मणजे द्राक्ष, आंबे वगैरे पदार्थांचा रस. आणि धान्यरस ह्मणजे पेज किंवा तेल वगैरे.)

यथागममित्यस्यार्थं चतुःश्लोक्या व्याचष्टे—

आतां पूर्वींच्या श्लोकांत यथाशास्त्र असें ह्मटलें आहे, तें शास्त्र पुढील चार श्लोकांत सांगतात—

पर्वपूर्वदिनस्यार्धे ।
भुक्त्वाऽतिथ्यशितोत्तरम् ॥
लात्वोपवासं यतिव- ।
द्विविक्तवसतिं श्रितः ॥ ३६ ॥
धर्मध्यानपरो नीत्वा ।
दिनं कृत्वाऽऽपराह्णिकम् ॥

नयेत्त्रियामां स्वाध्याय- ।
रतः प्रासुकसंस्तरे ॥ ३७ ॥

टीका—नयेद्गमयेत् प्रोषधोपवासी । कां त्रियामां रात्रिं । क्व प्रासुकसंस्तरे निर्जन्तुकायां भूमौ निर्जन्तुकैश्च तृणदर्भादिभिः कृते शयने । किंविशिष्टः सन् स्वाध्यायरतः । एतेन निद्रालस्ये त्यजेदिति लक्षयति । किं कृत्वा विधाय । किं तत आपराह्णिकं अपराह्णे भवं कर्म सांध्यं क्रियाकल्पमित्यर्थः । किं कृत्वा नीत्वा अतिक्रम्य । किं तत् दिनं । किंविशिष्टः सन् धर्मध्यानपर आज्ञापायविपाकलोकसंस्थानविचयैकाग्रचिन्तानिरोधलक्षणधर्मध्यान-परः । ध्यानोपरमे स्वाध्यायानुप्रेक्षाचिन्तनादिकमपि कार्यमिति पर-शद्बेन प्रधानार्थेन सूच्यते । किंविशिष्टो भूत्वा श्रितः अधिष्ठितः । कां विविक्तवसतिं विविक्तां प्रासुकां अयोग्यजनरहितां निर्जनां वा वसतिं स्थानं । किं कृत्वा लात्वा स्वीकृत्य । कं उपवासं । किंवत् यतिवत् यतिना तुल्यं यथा यतिर्भोजनानन्तरमेवोपवासं गृह्णाति विधिवत्सूरेश्च समीपं गत्वा पुनरुच्चारयति । सावद्यव्यापारं शरीरसंस्कारमब्रह्म च सदा त्यजति एवं प्रोषधे श्रावकोऽपि प्रवर्ततामित्यर्थः ॥ किं कृत्वा भुक्त्वा यथाविधि भोजनं कृत्वा । कथं अतिथ्यशितोत्तरं अतिथेरशिताद्भोजनविधापनादनन्तरमतिथिं भोजयित्वेत्यर्थः । क्व अर्धे । कस्य पर्वपूर्वदिनस्य सप्तम्यास्त्रयोदश्याश्च अर्धे प्रहरद्वये वा किञ्चिन्न्यूनेऽधिकेऽपि वा । समेऽप्यसमेऽपि वांऽशेऽर्धशद्बस्य रूढत्वात् ॥

अर्थ—श्रावकानें, पर्वाच्या ( अष्टमी व चतुर्दशी ह्या दोन दिवसांच्या ) पूर्वदिवशीं, मध्यान्हकालीं अतिथीच्या भोजनानंतर भोजन करून यतीप्रमाणें ( भोजनोत्तर उप-

वासाचा संकल्प करितात. व तो आपण केलेला संकल्प पंडिताजवळ सांगतात. आणि निंद्य व्यापार, शरीरसंस्कार ह्म० अंग चोळणें किंवा रगडणें, अब्रह्मचर्य इत्यादिकांचा त्याग करितात. त्याप्रमाणें ) उपवास ग्रहण करावें. मग एकांतस्थळीं बसून धर्मध्यानांत आसक्त राहून दिवस घालवावा. मग सायंकालिक विधि करून निर्जंतुक प्रदेशांत घातलेल्या निर्जंतुक अशा तृणासन अथवा दर्भासन ह्यावर, स्वाध्याय करण्यांत आसक्त राहून, ती रात्र घालवावी.

ततः प्राभातिकं कुर्या- ।
त्तद्वद्यामान् दशोत्तरान् ॥
नीत्वाऽतिथिं भोजयित्वा ।
भुञ्जीतालौल्यतः सकृत् ॥ ३८ ॥

टीका—कुर्याद्विदध्यात् प्रोषधोपवासी । किं तत्प्राभातिकं प्रभाते भवं कर्मावश्यकादिकं । कस्मात् ततः यथोक्तविधिना प्रहरषट्कनयनादनन्तरं । ततश्च भुञ्जीत भोजनं कुर्यात् असौ । कस्मादलौल्यतः भोजने आसक्तिमकृत्वेत्यर्थः । कथं सकृदेकवारं पारणकदिनेऽप्येकभुक्तं कुर्यादित्यर्थः । किं कृत्वा भोजयित्वा भोजनं कारयित्वा । कं अतिथिं । किं कृत्वा नीत्वा लङ्घयित्वा । कान् यामान् प्रहरान् । कति दश । किंविशिष्टानुत्तरान् । अष्टावुपवासगोचराहोरात्रस्य द्वौ चोत्तरदिनस्य । किंवत् तद्वत् पूर्वोक्तषट्प्रहरवत् ॥

अर्थ—मग दुसऱ्या दिवशीं (अष्टमी किंवा चतुर्दशी ह्या दिवशीं) सकाळीं करावयाचें सर्व कर्म करून, पूर्वी-

प्रमाणेंच ( धर्मध्यान करून व स्वाध्याय करून ) पुढले दहा प्रहर ( त्या दिवशींचे आठ प्रहर व पारण्याच्या दिवशींचे मध्यान्हापर्यंत दोन प्रहर मिळून दहा प्रहर ) घालवून, मग अतिथीस भोजन करवून, आपण फार आसक्ति न करितां, एकवार भोजन करावें.

पूजयेोपवसन् पूज्यान् ।
भावमय्यैव पूजयेत् ॥
प्रासुकद्रव्यमय्या वा ।
रागाङ्गं दूरमुत्सृजेत् ॥ ३९ ॥

टीका—पूजयेदर्चयेत् असौ । उपवसन्नुपवासतपश्चरन् । कान् पूज्यान् परमेष्ठिश्रुतगुरून् । कया पूजया आराधनया । किंविशिष्टया भावमय्या सानुरागतद्गुणानुस्मरणलक्षणया भावपूजार्थत्वात् द्रव्यपूजायाः । भावपूजा च सामायिकप्रसक्तत्वेनोपवसतः सिद्धेव । तदशक्तौ वा पूज्यान् पूजया पूजयेत् । किंविशिष्टया प्रासुकद्रव्यमय्या अक्षतमौक्तिकमालादिप्रकृतया । तथा दूरमत्यन्तं । उत्सृजेत् त्यजेदसौ । किं तत् रागाङ्गं इन्द्रियमनःप्रीतिसाधनं गीतनृत्यादिकं ॥

अर्थ—उपवास करणाऱ्या श्रावकानें, पूजा करण्यास योग्य अशा पंचपरमेष्ठी, श्रुत गुरु इत्यादिकांस भावमय पूजेनें ( मानस पूजेनें अथवा प्रेमपूर्वक त्यांच्या गुणांचें स्मरण करणें ह्या पूजेनें ) पूजावें. अथवा निर्जंतुकद्रव्यांनीं ( गंध अक्षता मौक्तिकमाला वगैरेच्या योगानें ) पूजावें. आणि मनाला व इतर इंद्रियांना संतोष देणाऱ्या गीतनृत्यादि व्यापारांचा त्याग करावा.

एतद्व्रतातिचारपरिहारार्थमाह—

आतां; ह्या व्रताच्या अतीचारांचा त्याग करण्याकरितां सांगतात.

ग्रहणास्तरणोत्सर्गा- ।
ननवेक्षाप्रमार्जनान् ॥
अनादरमनैकाग्र्य- ।
मपि जह्यादिह व्रते ॥ ४० ॥

टीका—जह्यात् त्यजेत् श्रावकः । कान् ग्रहणास्तरणोत्सर्गान् त्रीन् । किंविशिष्टान् अनवेक्षाप्रमार्जनान् । तथा अनादरं चतुर्थं । अनैकाग्र्यं च पञ्चमं । क इहास्मिन् प्रोषधोपवासाख्ये व्रते । अत्र ग्रहणं अर्हदादिपूजोपकरणपुस्तकादेरात्मपरिधानाद्यर्थस्य वाऽऽदानं । उपलक्षणात्तन्निक्षेपोऽपि आस्तरणं संस्तरोपक्रमणं । उत्सर्गो विण्मूत्रादीनां त्यागः । अवेक्षा जन्तवः सन्ति न सन्तीति वा चक्षुषा अवलोकनं । प्रमार्जनं मृदुनोपकरणेन प्रतिलेखनं । अवेक्षा च प्रमार्जनं च अवेक्षाप्रमार्जने ते न विद्येते येषु तान् । इह चानवेक्षया दूरावेक्षणमप्रमार्जनेन च दुष्प्रमार्जनं संगृह्यते नञः कुत्सार्थस्यापि दर्शनात् । यथा कुत्सितो ब्राह्मणोऽब्राह्मणः । अनादरः क्षुत्पीडितत्वादावश्यकेष्वनुत्साहः प्रोषधव्रत एव वा । तद्वदनैकाग्र्यमपि अन्यमनस्कत्वम् ॥

अर्थ—ज्यांत अवेक्षा (जंतू आहेत किंवा नाहींत हें डोळ्यानीं पहाणें) व प्रमार्जन (जंतू असतील अशा बुद्धीनें ते जाण्याकरितां हळूंच झाडणें) हे दोनही व्यापार नाहींत असें ग्रहण, (अर्हत्पूजेकरितां पुस्तक वगैरे घेणें किंवा आपल्यास परिधान करण्याकरितां वस्त्र घेणें) २ आस्तरण

(शय्या अंथरणें), ३ उत्सर्ग (मलमूत्रांचा त्याग करणें) ह्या तीन्ही क्रिया (ग्रहण, आस्तरण, उत्सर्ग.) व्रती श्रावकानें ह्या प्रोषधोपवासव्रतांत करूं नयेत. तसेंच ४ अनादराचा (व्रत करण्याविषयीं उत्साह नसणें ह्याचा) ही त्याग करावा. आणि ५ अनैकाग्र्याचा (चित्ताची एकाग्रता नसणें) त्याग करावा.

अथातिथिसंविभागव्रतं लक्षयति—

आतां; अतिथिसंविभागव्रताचें स्वरूप दाखवितात.

व्रतमतिथिसंविभागः ।
पात्रविशेषाय विधिविशेषेण ॥
द्रव्यविशेषवितरणं ।
दातृविशेषस्य फलविशेषाय ॥ ४१ ॥

टीका—भवति । किं तद्व्रतं नियमेन सेव्यतया प्रतिपन्नत्वात् तथा च सति अतिथ्यलाभेऽपि तद्दानफलभावत्वोपपत्तेः । किं नाम अतिथिसंविभागः अतिथेः सम्यक् निर्दोषो विभागः स्वार्थकृतभक्ताद्यंशदानरूपः । एतदेव व्यक्तीकर्तुमाह- द्रव्यविशेषवितरणं वक्ष्यमाणलक्षणविशिष्टद्रव्यदानं । कस्मै पात्रविशेषाय । कस्य कर्तुः दातृविशेषस्य । केन विधिविशेषेण । कस्मै फलविशेषाय ॥

अर्थ—विवक्षितफल मिळण्याकारितां, शास्त्रांत वर्णन केलेल्या विधीनें सत्पात्रीं निर्दोषपदार्थांचें—निर्दोषदात्यानें केलेलें जें दान त्यास अतिथिसंविभागव्रत असें ह्मणतात.

अतिथिशब्दव्युत्पादनमुखेनातिथिलक्षणमाह—

आतां; अतिथि शब्दाचा अर्थ दाखवून त्या अर्थावरून अतिथीचें लक्षण सांगतात.

ज्ञानादिसिध्यर्थतनु- ।
स्थित्यर्थान्नाय यः स्वयम् ॥
यत्नेनातति गेहं वा ।
न तिथिर्यस्य सोऽतिथिः ॥ ४२ ॥

**टीका**—भवति । कोऽसावतिथिः । यः किं योऽतति सर्वदा गच्छति । किं तत् गेहं दातृगृहं । केन यत्नेन संयमाविराधनेन। कथं स्वयं आह्वानादिना विना । किमर्थं ज्ञानादीत्यादि- ज्ञाना-दीनां सिद्धिः साधनं सम्पूर्णीकरणं ज्ञानादिसिद्धिरर्थः प्रयोजनं यस्याः सा ज्ञानादिसिध्यर्था सा चासौ तनुश्च शरीरं ज्ञानादिसिध्य-र्थतनुः तस्याः स्थितिर्यावदायुरवस्थानं सैवार्थः प्रयोजनं यस्य तत्त-दर्थं तच्च तदन्नं च भोजनं तस्मै वा । अथवा सोऽतिथिर्भण्यते । उपलक्षणात्पर्वोत्सवौ च । नास्ति तिथिर्यस्येत्यतिथिरिति व्युत्पत्तेः । उक्तं च—तिथिपर्वोत्सवाः सर्वे त्यक्ता येन महात्मना ॥ अतिथिं तं विजानीयाच्छेषमभ्यागतं विदुः ॥ १ ॥

**अर्थ**—ज्ञानादिकांच्या प्राप्तीस साधन असलेल्या देहाच्या संरक्षणास उपयोगीं असलेल्या अन्नाकरितां जो स्वतः प्रत्येक घरीं श्रमानें हिंडतो त्यास अतिथि असें ह्मणतात. किंवा ज्याला तिथि नाहीं—ह्मणजे पर्व अथवा उपवासदिवस हे ज्याला भिक्षा मागण्यास प्रतिबंधक नाहींत—त्यास अतिथि असें ह्मणतात.

पात्रस्वरूपसंख्यानिर्णयार्थमाह—

**आतां; पात्राचें ( दान घेणाराचें ) स्वरूप व त्याचे प्रकार, हे समजण्याकरितां सांगतात.**

यत्तारयति जन्माब्धेः ।
स्वाश्रितान्यानपात्रवत् ॥
मुक्त्यर्थगुणसंयोग- ।
भेदात्पात्रं त्रिधा मतम् ॥ ४३ ॥

**टीका**—अस्ति भवति । किं तत्पात्रं । कतिधा त्रिधा त्रिभेदं कस्मात् मुक्तेरर्थो निमित्तं कारणं, मुक्तिर्वाऽर्थः प्रयोजनं येषां ते मुक्त्यर्थास्ते च ते गुणाश्च सम्यग्दर्शनादयो मुक्त्यर्थगुणास्तेषां संयोगः संयुज्यमानत्वं तेन भेदो विशेषस्तस्मात् । यत्किं यत्तारयति पारं प्रापयति । कान् स्वाश्रितान् दानस्य कर्तृहेतुकर्त्रनुमन्तॄन् । कस्मात् जन्माब्धेः संसारादर्णवादिव । किंवत् यानपात्रवत् यानपात्रमम्भोधिस्थं यथा स्वाश्रितान् साँयात्रिकादीन् समुद्रात्तारयति तथा संसारादाश्रितान् यत्तारयति तत्पात्रमित्यर्थः ॥

**अर्थ**—आपला आश्रय करून राहिलेल्या ( दात्यास ) जें आपल्यामध्यें असलेल्या- मुक्तिप्राप्तीस उपयोगीं अशा विशेषगुणामुळें, नौकेप्रमाणें संसारसमुद्रापासून तारितें; तें पात्र होय. तें पात्र ( दान घेणारा ) तीन प्रकारचें आहे.

एतदेव विशेषयन्नाह—

ते तीन प्रकारच विशेषेंकरून सांगतात.

यतिः स्यादुत्तमं पात्रं ।
मध्यमं श्रावकोऽधमम् ॥
सुदृष्टिस्तद्विशिष्टत्वं ।
विशिष्टगुणयोगतः ॥ ४४ ॥

टीका—स्यात् । किं तत् पात्रं । किंविशिष्टं उत्तममुत्कृष्टं । किं तत् यतिः संयुज्यमानरत्नत्रयः । तथा मध्यमं पात्रं स्यात् । किं तत् श्रावकः संयुज्यमानसम्यग्दर्शनज्ञानविकलसंयमः । तथा अधमं पात्रं स्यात् । किं तत् सुदृष्टिरसंयतसम्यग्दृष्टिः । स्याच्च । किं तत् तद्विशिष्टत्वं तेषामुत्तममध्यमाधमपात्राणां विशेषः परस्परतः परेभ्यश्च भेदः । कस्मात् विशिष्टगुणयोगतः गुणविशेषसम्बन्धात् ॥

अर्थ— यती ( रत्नत्रयानें युक्त असलेला ) हें उत्तम पात्र होय, श्रावक हें मध्यम पात्र होय, आणि सुदृष्टि हा मध्यम पात्र होय. ह्यांत हा जो भेद आहे, तो, त्यांच्या त्यांच्या विशेषगुणामुळें आहे.

दानविधेः प्रकारान् वैशिष्ट्यं चाह—

आतां; दानविधीचे प्रकार सांगतात.

प्रतिग्रहोच्चस्थानांघ्रि- ।
क्षालनार्चानतीर्विदुः ॥
योगान्नशुधीश्च विधीन् ।
नवादरविशेषितान् ॥ ४५ ॥

टीका—विदुः जानन्ति पूर्वाचार्याः । कान् विधीन् दानप्रयोगोपायान् । कति नव । किमाख्यान् प्रतिग्रहादीन् । किंविशिष्टान् आदरविशेषितान् आदरेण यथायोग्यभक्त्युपचारेण वैशिष्ट्यं नीतान् ॥ तत्र प्रतिग्रहः स्वगृहद्वारे यतिं दृष्ट्वा प्रसादं कुरुतेत्यभ्यर्थ्य नमोऽस्तु तिष्ठतेति त्रिर्भणित्वा स्वीकरणं ॥ उच्चस्थानं स्वगृहान्तः स्वीकृतयतिं नीत्वा निरवद्यानुपहतस्थाने उच्चासने

निवेशनं ॥ अंघ्रिक्षालनं तथास्वीकृतनिवेशितसंयतस्य प्रासुकोदकेन पादधावनं तत्पादोदकवन्दनं च ॥ अर्चा तथाक्षालितांघ्रेः संयतस्य गन्धाक्षतादिभिः पादपूजनं ॥ आनतिः तथापूजितसंयतस्य पञ्चाङ्गप्रणामकरणं । एते पञ्च ॥ तथा योगशुद्धयो मनोवाक्कायप्रसत्तयस्तिस्रः ॥ एका चान्नशुद्धिः । तत्र मनःशुद्धिरार्तरौद्रवर्जनं ॥ वाक्शुद्धिः परुषकर्कशादिवचोवर्जनं ॥ कायशुद्धिः सर्वत्र संवृताचारतया प्रवर्तनं ॥ अन्नशुद्धिः चतुर्दशमलरहितस्याहारस्य यतनया शोधितस्य हस्तपुटेऽर्पणम् ॥

अर्थ— १ प्रतिग्रह, २ उच्चस्थान, ३ अंघ्रिक्षालन, ४ अर्चा, ५ आनति, ६ तीन प्रकारच्या योगशुद्धि ( काययोगशुद्धि, वाक्योगशुद्धि, मनोयोगशुद्धि ) ९ अन्नशुद्धि असे नऊ प्रकारचे विधि ( दानाचे साधक व्यापार ) आहेत, व ह्यांतील प्रत्येक व्यापार भक्तियुक्त असावा असें पूर्वाचार्य मानितात [ ह्यांचें स्पष्टीकरण. १ 'प्रतिग्रह, ह्मणजे आपल्या घराच्या द्वारांत प्राप्त झालेल्या यतीस पाहून त्याच्याजवळ जाऊन 'महाराज आह्मांवर कृपा करा' अशी प्रार्थना करून, नमोऽस्तु तिष्ठत' ( आपल्यास नमस्कार असो, उभे रहा ) असें तीन वेळ ह्मणून, आपण भक्तिपूर्वक त्या यतीचा स्वीकार करणें. २ 'उच्चस्थान, ह्मणजे, त्या यतीस घरांत नेऊन, निर्जंतुक अशा प्रदेशांत उच्चासनावर बसविणें. ३ 'अंघ्रिक्षालन, ह्मणजे निर्जंतुक अशा उदकानें त्याचे पाय धुणें, व तें उदक वंदन करणें. ४ 'अर्चा ह्मणजे गंध, अक्षता इत्यादि-द्रव्यांनीं त्या पायांची पूजा करणें. ५ 'आनति' ह्मणजे पूजित अशा यतीस पंचांगनमस्कार करणें. ६ 'काय-

योगशुद्धि ' सर्वत्र आपलें शरीर झांकून संकोचानें चालणें. ७ 'वाग्योगशुद्धि' मर्मभेदक व कठोर भाषण न बोलणें. ८ 'मनोयोगशुद्धि' ह्मणजे, आर्त, रौद्र ध्यान वर्ज करणें ९ 'अन्नशुद्धि, ह्मणजे चतुर्दश प्रकारच्या मलांनीं रहित असें अन्न यतीच्या हातावर देणें.

देयद्रव्यविशेषनिर्णयार्थमाह--

आतां; निर्दोष द्रव्याचें ज्ञान होण्याकरितां सांगतात.

पिण्डशुध्युक्तमन्नादि- ।
द्रव्यं वैशिष्ट्यमस्य तु ॥
रागाद्यकारकत्वेन ।
रत्नत्रयचयाङ्गता ॥ ४६ ॥

टीका— भवति । किं तत् द्रव्यमर्थाद्देयं । किंविशिष्टमन्नादि आहारौषधावासपुस्तकपिच्छिकादि । किंविशिष्टं तत् पिण्डशुध्युक्तं पिण्डशुद्धौ पिण्डशुद्धिप्ररूपणार्थे पूर्वमनगारधर्मस्कन्धे पञ्चमाध्याये प्रतिपादितं । अस्य तु यथोक्तदेयद्रव्यस्य पुनर्भवति । किं तत् वैशिष्ट्यं विशेषः किं तत् रत्नत्रयचयाङ्गता सम्यग्दर्शनादिवृद्धिकारणत्वं । केन रागाद्यकारकत्वेन रागद्वेषासंयममददुःखचयाद्यजनकत्वेन ॥

अर्थ— पिंडशुद्धिप्रकरणांत [ पूर्वी अनगारधर्मस्कंधांत पंचमाध्यायांत ] सांगितलेल्या अन्न वगैरे [ अन्न, औषध, वस्त्र, पुस्तक, पिच्छिका वगैरे ] द्रव्य, हें निर्दोषद्रव्य असें समजावें. अशा प्रकारच्या द्रव्यांत विशेष असा आहे कीं, हें अन्नादिद्रव्य रागद्वेषादिकांस उत्पन्न करणारें नसून, रत्नत्रयांस साधक आहे.

दातृलक्षणं तद्वैशिष्ट्यं चाह—

**आतां; दान करणाऱ्याचें (दात्याचें) लक्षण व त्याचेच विशेषगुण सांगतात.**

**नवकोटीविशुद्धस्य ।**
**दाता दानस्य यः पतिः ॥**
**भक्तिश्रद्धासत्वतुष्टि- ।**
**ज्ञानालौल्यक्षमागुणः ॥ ४७ ॥**

**टीका**— स दाता भण्यते पूर्वाचार्यैः । यः किं यो भवति । किंविशिष्टः पतिः स्वामी प्रयोक्ता । कस्य दानस्य देयस्य दत्ति-क्रियायाः वा । किंविशिष्टस्य नवकोटीविशुद्धस्य नवकोट्यः मनोवाक्कायैः प्रत्येकं कृतकारितानुमतानि । अथवा देयशुद्धि-स्तत्कृते च दातृपात्रशुद्धी, दातृशुद्धिस्तत्कृते च देयपात्रशुद्धी, पात्रशुद्धिस्तत्कृते च देयदातृशुद्धी चेत्यार्षोक्ताः । नवकोटीभि-र्विशुद्धमकृतापिण्डशुध्द्युक्तदोषसम्पर्कं । आर्षोक्तं तत्पक्षे तु नवकोट्या विशुद्धाः सुप्रसिद्धा यत्रेति विग्रहः । किंविशिष्टः सन् भक्ती-त्यादि भक्त्यादयः सप्तगुणाः विशेषणानि परासाधारणानि यस्य स तथोक्तः । तत्र भक्तिः पात्रगुणानुरागः । श्रद्धा पात्रदानफले प्रतीतिः । सत्वं सत्वाख्यो मनोगुणः स्वल्पवित्तस्यापि स्वाढ्याश्चर्य-कारिदानप्रवृत्त्यङ्गं । तुष्टिः दत्ते दीयमाने च प्रहर्षः । ज्ञानं द्रव्यादिवेदित्वं । अलौल्य सांसारिकफलानपेक्षा । क्षमा दुर्निवार-कालुष्यकारणोत्पत्तावपि कोपाभावः ॥ तदुक्तं— भाक्तिकं तौष्टिकं श्राद्धं सविज्ञानमलोलुपम् ॥ सात्विकं क्षमकं सन्तो दातारं सप्तधा विदुः ॥ १ ॥ किं च सत्वादिगुणदातृकं दानमपि सात्विकादि-भेदात्त्रिविधमिष्यते । तदुक्तं—आतिथेयं हितं यत्र यत्र पात्रपरीक्षणम् ॥

गुणाः श्रद्धादयो यत्र तद्दानं सात्विकं विदुः ॥ १ ॥ यदात्मवर्णनप्रायं क्षणिकाहार्यविभ्रमम् ॥ परप्रत्ययसम्भूतं दानं तद्राजसं मतम् ॥ २ ॥ पात्रापात्रसमावेक्षमसत्कारमसंस्तुतम् ॥ दासभृत्यकृतोद्योगं दानं तामसमूचिरे ॥ ३ ॥ उत्तमं सात्विकं दानं मध्यमं राजसं भवेत् ॥ दानानामेव सर्वेषां जघन्यं तामसं पुनः ४

अर्थ— नवकोटींनीं शुद्ध ( ह्मणजे जींत नऊ प्रकारच्या कोटी नाहींत ) अशा दानक्रियेचा जो कर्ता, त्यास दाता असें ह्मणतात. ( नऊ कोटी ह्मणजे- मन, वाणी, शरीर ह्यांतील प्रत्येकानें दोष करणें, करविणें व अनुमती देणें- ह्या नऊ कोटी होतात. ) आणि १ भक्ती ( ज्यांस दान करावयाचें त्यांच्या ठिकाणीं असलेल्या सद्गुणाविषयीं प्रीति ) २ श्रद्धा ( योग्य ठिकाणीं दान केलें असतां त्यापासून उत्पन्न होणाऱ्या फलाविषयीं विश्वास ) ३ सत्व ( ज्याचें द्रव्य थोडें आहे अशा मनुष्यानें आपल्यापेक्षां समर्थासहि आश्चर्य वाटेल असें दान करण्यास उपयोगीं पडणारें मनाचें धैर्य ) ४ तुष्टि ( दान करण्यासंबंधी संतोष ) ५ ज्ञान ( द्रव्य कसें असावें, पात्र कसें असावें ह्याविषयीं माहिती. ) ६ अलौल्य ( सांसारिक फलाची इच्छा नसणें ) ७ क्षमा ( अंतःकरण बिघडण्याचें जबर कारण उपस्थित झालें असतां देखील कोप न येणें ) हे सात त्याचे ( दात्याचे ) विशेषगुण आहेत. हें दान सात्त्विक, राजस आणि तामस असें तीन प्रकारचें आहे. ज्यांत अतिथीची सेवा स्वतः केलेली असते, व ज्यांत पात्राची योग्य परीक्षा झालेली असते, आणि ज्यांत भक्ति श्रद्धा वगैरे दातृगुण आहेत, असें जें दान, तें सात्त्विकदान

होय. ज्यांत दाता आपलें वर्णन करीत असतो व ज्यांत श्रद्धा भक्ति इत्यादि गुणांचा खोटाच डौल असतो व जें दुसऱ्याच्या सांगण्यावरून ( आपल्यास माहित नसतांही ) करतात तें राजसदान होय. आणि, ज्यांत पात्रापात्राचा विचार नाहीं, अतिथीचा सत्कार नाहीं, व जें निंद्य आहे, आणि ज्यासंबंधी सर्व उद्योग सेवकांनीं केलेले आहेत, असें जें दान, तें तामसदान होय. ह्यांत सात्त्विकदान हें उत्तम; राजस मध्यम व तामस अधम समजावें.

दानफलं तद्विशेषं च व्याचष्टे—

आतां दानाचें फल व त्याचा विशेष सांगतात–

रत्नत्रयोच्छ्रयो भोक्तु- ।
दातुः पुण्योच्चयः फलम् ॥
मुक्त्यन्तचित्राभ्युदय- ।
प्रदत्वं तद्विशिष्टता ॥ ४८ ॥

टीका—भवति । किं तत् फलं दानस्य साध्यं । कस्य भोक्तुराहाराद्युपयोक्तुः । किं तत् रत्नत्रयोच्छ्रयः सम्यग्दर्शनादीनामुद्गतिः तथा तत्फलं भवति । कस्य दातुर्दायकस्य किं तत्पुण्योच्चयः सुकृतराशिः । भवति । काऽसौ तद्विशिष्टता तस्य दानस्य फलस्य वैशिष्ट्यं । किं तत् मुक्त्यन्तेत्यादि चित्रा नानाप्रकारा इन्द्रचक्रिबलदेवतीर्थकरादिपदलक्षणाः विश्वविस्मयकराश्च अभ्युदयाश्चित्राभ्युदयाः, मुक्तिरनन्तज्ञानादिचतुष्टयप्राप्तिलक्षणं निःश्रेयसं अन्ते अवसाने फलोपभोगच्छेदे येषां ते मुक्त्यन्तास्ते च ते चित्राभ्युदयाश्च मुक्त्यन्ताचित्राभ्युदयास्तान् प्रकर्षेणाप्रतिबन्धलक्षणेन ददाति सम्पा-

दयतीति तत्प्रदं, तस्य भावस्तत्त्वम् ॥ उक्तं च—पात्रदाने फलं मुख्यं मोक्षः सस्यं कृषेरिव ॥ पलालमिव भोगास्तु फलं स्यादानुषङ्गिकम् ॥ १ ॥

अर्थ—दान केलेल्या पदार्थाचा उपभोग करणाऱ्यास रत्नत्रयाची प्राप्ती होते. व देणाऱ्यास पुण्यसमुदाय प्राप्त होतो. मुक्ति हा ज्यांचा शेवट आहे असे अनेकप्रकारचे अभ्युदय ( इंद्रपद, चक्रिपद, बलदेवपद तीर्थंकरपद इत्यादि अनेक पदें ) देणें हा त्या दानाचा विशेषधर्म होय. ह्याबद्दल शास्त्रकारांनीं असें सांगितलें आहे कीं—'पात्रदाने फलं मुख्यं मोक्षः सस्यं कृषेरिव । पलालमिव भोगास्तु फलं स्यादानुषङ्गिकम् ॥ १ ॥ ज्याप्रमाणें भूमी नांगरण्याचें मुख्यफल धान्य आहे, त्याप्रमाणें सत्पात्रीं दान केल्याचें मुख्यफल मोक्ष हें आहे. आणि बाकीचे इंद्रपदादि भोग हे धान्यावरील कोंड्याप्रमाणें अप्रधान फल आहे.

गृहव्यापारप्रभवपातकापनोदनसामर्थ्यं मुनिदानस्य दर्शयति—

आतां; मुनीला केलेल्या दानास गृहव्यापारापासून होणारें पातक घालविण्याचें सामर्थ्य आहे, असें सांगतात.

पञ्चसूनापरः पापं ।
गृहस्थः सञ्चिनोति यत् ॥
तदपि क्षालयत्येव ।
मुनिदानविधानतः ॥ ४९ ॥

टीका— यत्पापं सञ्चिनोति सम्बध्नाति गृहस्थः । किंविशिष्टः

सन् पञ्चसूनापरः पेषणी कुट्टनी चुल्ली उदकुम्भी प्रमार्जनी चेति पञ्च क्रियाः सूना इति प्रसिद्धाः । सूना इव सूनाः प्राणिघातस्थान-साधर्म्यात् । पञ्च सूनाः पराः प्रधानानि यस्य सः पञ्चसूनापरः । आसामवश्यम्भावित्वाद्गृहस्थस्य प्राधान्येनोपादानं । तेन ततो अन्यान्यपि पापकर्माणि गुणभावेन गृहिणः संगृह्यन्ते । क्षालयत्येव अवश्यं स्फेटयति । गृहस्थः । किं तत् तदपि पञ्चावश्यकार्य-व्यापारहेतुकं पापं । अपिर्विस्मये समुच्चये वा । न केवलं तदेव पापं क्षालयति व्यापारान्तरप्रभवमपीत्यर्थः । कस्मात् मुनिदान-विधानतः मुनये उत्तमपात्राय दानं स्वपरोपकाराय स्वद्रव्यातिसर्जनं मुनिदानं तस्य विधानं विधिवत्प्रयोगः तस्मात्तेन वा ॥

अर्थ—पंचसूना ( दळणें, कांडणें, चूल पेटविणें, पाणी भरणें व लोटणें ह्यांपासून होणाऱ्या हिंसेस 'पंचसूना' असें नांव आहे ) करण्यांत आसक्त असलेला गृहस्थ श्रावक, जें पातक सांठवितो ; तें पातक देखील तो मुनिदानविधीनें निःसंशय घालवितो.

दानस्य कर्त्रादीनां फलानि दृष्टान्तमुखेन स्पष्टयति—

आतां; मुनीस दान केलें असतां कोणतें फल प्राप्त होतें, तें उदाहरण देऊन स्पष्टपणें दाखवितात.

यत्कर्ता किल वज्रजङ्घनृपतिर्यत्कारयित्री सती ।
श्रीमत्यप्यनुमोदका मतिवरव्याघ्रादयो यत्फलम् ॥
आसेदुर्मुनिदानतस्तदधुनाऽप्याप्तोपदेशाब्दक- ।
व्यक्तं कस्य करोति चेतसि चमत्कारं न भव्यात्मनः

टीका— किल एवं ह्यार्षे श्रूयते । यदासेदुः प्राप्ताः । के ते मुनि-

दानस्य कर्त्रादिभावमापन्ना वज्रजङ्घमहाराजप्रभृतयः। किं तत्फलं। कस्मात् मुनिदानतः। तत्कस्य चेतसि चमत्कारं न करोतीति समुदायेनार्थकथनं। इयं तु प्रत्येकवाक्यपरिसमाप्तिरिदानीं प्रदर्श्यते। यत्किल वज्रजङ्घनृपतिरुत्पलखेटनगराधिपतिर्वज्रजङ्घो नाम नृपतिराससाद प्राप्तः। किं तत्फलं। कस्मान्मुनिदानतः। किंविशिष्टः सन् कर्ता दानस्य स्वातंत्र्येण विधाता। यच्च आससाद। काऽसौ सती पतिव्रता। किंनाम्नी श्रीमती पुण्डरीकिणीनाथस्य वज्रदन्तचक्रिणः पुत्री वज्रजङ्घनृपतेः पत्नी। किं तत् फलं। कस्मात् मुनिदानतः। किंविशिष्टा सती कारयित्री स्वभर्तुर्दानं कुर्वतः प्रयोजयित्री। अपिः समुच्चये पूर्वत्रोत्तरत्र च चशब्दार्थे योज्यः। यच्च आसेदुः प्राप्ताः के ते मतिवरव्याघ्रादयो मुनिदानतः फलं। मतिवरो वज्रजङ्घनृपजतेर्मन्त्री आदिशब्दादानन्दो नाम तस्यैव पुरोहितोऽकम्पनाभिधानः सेनापतिर्धनमित्रनामा च श्रेष्ठी। पुनरादिशब्दात्सूकरो वानरो नकुलश्च गृह्यते। मतिवरश्च व्याघ्रश्च मतिवरव्याघ्रौ तावादी येषामानन्दाख्यपुरोहितादीनां तद्वनवासिसूकरादीनां च ते मतिवरव्याघ्रादय इति विग्रहः। किंविशिष्टाः सन्तोऽनुमोदका एष साधु करोतीति तद्दानस्यानुमन्तारः तत्कर्तृत्वकारयितृत्वानुमोदकत्वपरिणामद्वारायातसुकृतसंघातहेतुकं मुनिदानफलं कर्तृकस्य भव्यात्मनः चेतसि चमत्कारं न करोति? सर्वस्यापि करोतीत्यर्थः। कदा अधुनाऽपि। किं पुनस्तत्काले। किंविशिष्टं सत् आप्तोपदेशाद्बकव्यक्तं आप्तानां परापरगुरूणामुपदेशो रहस्यवाक्यमाप्तोपदेशः स एवाद्बक आदर्शः स्वविषयार्थस्पष्टप्रतीतिनिमित्तत्वादाप्तोपदेशाद्बकस्तत्र तेन वा व्यक्तं प्रतीतियोग्यतां नीतम्॥

**अर्थ—मुनिदानापासून तें करणारा वज्रजंघराजा जें फल प्राप्त होता झाला, आणि तें करविणारी त्याची महापतिव्रता श्रीमती नांवाची पत्नी जें फल प्राप्त होती**

